शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालये व रूग्णालये यांना आवश्यक असणा-या औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने, उपकरणे व दंत सामुग्री इत्यादी बाबींची मे. हाफकिन महामंडळाकडून करण्यात आलेल्या खरेदीच्या खर्चास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

शासन निर्णय क्र.वैशिवि-२०१९/प्र.क्र. १६०/प्रशासन-२

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च, २०२२

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. खरेदी २०१६/प्र.क्र. ८२/भाग-III, उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. २४०/प्रशा-२, दिनांक २६.०७.२०१७

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम , दि. १७.०४.२०१५

४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/औखक/औषधी व सर्जिकल बाबी निविदेबाबत/ १३/ २०१८, दि. ०३.०१.२०१८

५) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, पत्र क्र. वैशिवि-२०१८/प्र.क्र.१०७/प्रशा-२, दि. ०७.०४.२०१८

६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/औखक/औषधी व सर्जिकल बाबींच्या खरेदीबाबत/ १११५७/ २०२१, दि. २६.०८.२०२१.

**प्रस्तावना :-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या दिनांक ०३.०१.२०१८ च्या प्रस्तावानुसार संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय वैद्यकीय व दंत महाविद्यालये व संलग्नित रूग्णालयांना लागणाऱ्या औषधी, सर्जिकल साहित्य व दंत सामुग्री व तद्नुषंगिक बाबी इत्यादींची आठ शेड्युलमधील २६३४ बाबींचा “संख्या करार” करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला. सदर सर्व बाबींची मिळून एकूण रक्कम रुपये २१६.६९ कोटी इतकी होती. त्यानुसार शासन पत्र दि. ०७.०४.२०१८ अन्वये मे. हाफकिन महामंडळाकडून औषधे व अन्य बाबींची खरेदी

करण्यासाठी आठ शेड्युलमधील २६३४ बाबींचा "संख्या करार" करण्याकरीता मान्यता देण्यात आली होती. तथापि सदर प्रशासकीय मान्यता विहित नमुन्यात देण्यात आली नसल्याने, कोषागार कार्यालयाने सदर खरेदीस प्रशासकीय मान्यता नसल्याबाबत आक्षेप नोंदविले आहेत. सदर बाब विचारात घेता, सन २०१८-२०१९ ते सन २०२०-२१ या कालावधीमध्ये वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांना आवश्यक असणा-या औषधी, सर्जिकल्स साहित्य व तद्‌नुषंगिक बाबींची हाफकिन महामंडळाने खरेदी करुन संस्थांना पुरवठा केलेल्या रु. २१४.१२ कोटी एवढ्या रक्कमेच्या खरेदीस कार्योत्तर मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय वैद्यकीय व दंत महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये यांना लागणा-या औषधी, सजिकल्स साहित्य, दंत सामुग्री व तद्‌नुषंगिक बाबी इत्यांदीची खरेदी मे. हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी आठ शेड्युलमधील एकूण २६३४ बाबींचा **"संख्या करार"** करण्यास शासनाच्या संदर्भ क्र. ५ वरील दिनांक ०७.०४.२०१८ रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली होती. शासनाचे सदर आदेश रद्द करुन खालीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

२. सन २०१८-२०१९ ते सन २०२०-२१ या कालावधीमध्ये वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांना आवश्यक असणा-या औषधी, सर्जिकल्स साहित्य व तद्‌नुषंगिक बाबींची हाफकिन महामंडळाने खरेदी करुन संस्थांना पुरवठा केलेल्या रु. २१४.१२ कोटी एवढ्या रक्कमेच्या खरेदीच्या खर्चास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील संस्थांनी सन २०१८-१९ मध्ये संक्षिप्त देयकावर आहरित केलेल्या रु. १२७.८३ कोटी एवढ्या निधीपैकी मे. हाफकिन महामंडळाकडे शिल्लक असलेला रु. ४०.८४ कोटी एवढा निधी सन २०१९-२० व सन २०२०-२१ मध्ये तसेच सन २०१९-२० मध्ये संक्षिप्त देयकावर आहरित करुन मे. हाफकिन महामंडळास वर्ग केलेला रु. ३१.८६ कोटी इतका निधी सन २०१९-२० व सन २०२०-२१ मध्ये पुरवठा झालेल्या औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने, उपकरणे व दंत सामुग्री औषधे व तद्‌नुषंगिक बाबींच्या अनुषंगाने केलेल्या खरेदीस समायोजन करण्यास शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७८/प्रशासन-२, दि. ०६.०२.२०१५ सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये नमुद वित्तीय

अधिकार नियमपुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-४५, नियम क्रमांक-१६९ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१०/२०२२/व्यय-१३ दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२२०३३११५५३१९५०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.03.31 17:50:48 +05'30'

**( म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व संबंधित जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी
७. सर्व अधिष्ठाता / अधीक्षक, शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालय व रूग्णालय
८. निवडनस्ती (प्रशासन -२)